**सन २०१३-१४ च्या रब्बी हंगामात ५० पैशांपेक्षा कमी अंतिम पैसेवारी असलेल्या ज्या गावांमध्ये टंचाई परिस्थिती जाहीर करण्यात आलेली आहे अशा गावांना सहकारी कर्जाचे रुपांतरण करणे बाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- टंचाई ०८१४/प्र.क्र.११४/२-स**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १९ /११/२०१४

**पहा :- शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. एससीवाय २०१४/प्र.क्र.९६/म-७, दि. २४ जुन २०१४**

**शासन परिपत्रक :-**

सन २०१३-१४ च्या पावसाळी मोसमात राज्यातील काही भागात पडलेल्या अपु-या पावसामुळे राज्यातील ज्या क्षेत्रात रब्बी पिकांची हंगामी पैसेवारी ५० पैशांपेक्षा कमी आढळून आली. त्या क्षेत्रातील गावांत उपरोक्त शासन निर्णयान्वये टंचाईसदृष्य परिस्थिती जाहीर करण्यात येऊन विविध सवलती जाहीर करण्यात आल्या आहेत. राज्यातील सर्व विभागामध्ये जिल्हाधिकाऱ्यांमार्फत रब्बी पिकांची अंतिम पैसेवारी जाहीर करण्यात आली आहे. जिल्हाधिकारी यांनी जाहीर केलेल्या अंतिम पैसेवारी प्रमाणे राज्यातील ५ महसुली विभागात एकूण ४८४ गावांमध्ये पैसेवारी ५० पैशांपेक्षा कमी आढळून आली आहे. या ५० पैशांपेक्षा कमी पैसेवारी घोषित केलेल्या ४८४ गावांमध्ये उपरोक्त शासन निर्णयान्वये टंचाई परिस्थिती जाहीर करण्यात येऊन सदर गावांना अतिरिक्त सुविधा नव्याने उपलब्ध करून देण्याचे जाहीर करण्यात आले आहे. यामध्ये पुढील सुविधा सहकार विभागाशी संबंधित आहेत.

**सहकारी कर्जाचे रुपांतरण :-**

२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय दि. २४ जुन २०१४ व त्या सोबतचे प्रपत्र "अ" या परिपत्रकासोबत जोडले असून शासनाच्या प्रचलित धोरणांनुसार उपरोक्त शासन निर्णयातील प्रपत्र "अ" मध्ये नमुद केलेल्या जिल्हयातील ज्या गावांमध्ये टंचाई परिस्थिती जाहीर केली आहे, त्या सर्व गावांतील अल्पमुदत कर्जाचे मध्यम मुदत कर्जात रुपांतरण करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी.

या शासन परिपत्रकाची अंमलबजावणी कटाक्षाने करण्यात येईल याची खबरदारी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य , पुणे यांनी घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२०१५४८११२००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Amolkar Vijay Ganpat

Digitally signed by Amolkar Vijay Ganpat
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Amolkar Vijay Ganpat
Date: 2014.11.20 15:55:50 +05'30'

**( विजय अमोलकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२) मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
३) मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
४) प्रधान सचिव (पुनर्वसन व मदतकार्य ), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) आयुक्त, कृषी संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र शासन.
९) सह सचिव, भारत सरकार, कृषी मंत्रालय (सहकार विभाग ) कृषी भवन, नवी दिल्ली.
१०) महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक, प्रादेशिक कार्यालय, पुणे.
११) मुख्य अधिकारी, रिझर्व बँक ऑफ इंडीया, ॲग्रिकल्चरल क्रेडीट डिपार्टमेंट, सेंट्रल ऑफिस, गारमेंट हाऊस, मुंबई ४०० ०१८.
१२) उप मुख्य अधिकारी, रिझर्व बँक ऑफ इंडिया, ॲग्रिकल्चरल क्रेडीट डिपार्टमेंट, बॉम्बे रिजनल ऑफिस, गारमेंट हाऊस, मुंबई ४०० ०१८.
१३) सर्व विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था.
१४) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
१५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक.
१६) सर्व कार्यकारी संचालक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक.
१७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय मंत्रालय, मुंबई
१८) सर्व कार्यासने, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,
१९) निवड नस्ती- २ स

शासन निर्णय , महसूल व वन विभाग क्रमांक - एससीवाय- २०१४/ प्र.क्र.९६/म-७
दिनांक :- २४ जून, २०१४
सन २०१३-१४ सालातील रब्बी पिकांच्या अंतिम पैसेवारीचा गोषवारा

**प्रपत्र -"अ"**

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | पैसेवारी जाहीर केलेली गावे | ५० पैशांपेक्षा कमी पैसेवारी असलेली गावे | ५० पैशांपेक्षा जास्त पैसेवारी असलेली गावे |
|---|---|---|---|---|---|
| १ | पुणे | पुणे | ५४२ | ० | ५४२ |
| | | सातारा | १९२ | ० | १९२ |
| | | सांगली | १०४ | ० | १०४ |
| | | सोलापूर | ११४४ | ८८ | १०५६ |
| | **एकूण** | | **१९८२** | **८८** | **१८९४** |
| २ | नाशिक | अहमदनगर | १०१८ | ३५५ | ६६३ |
| | **एकूण** | | **१०१८** | **३५५** | **६६३** |
| ३ | औरंगाबाद | उस्मानाबाद | ३३३ | ० | ३३३ |
| | **एकूण** | | **३३३** | **०** | **३३३** |
| ४ | अमरावती | अमरावती विभागाची पैसेवारी निरंक आहे. | | | |
| ५ | नागपूर | नागपूर | १४ | १४ | ० |
| | | भंडारा | १० | १ | ९ |
| | | चंद्रपूर | ३९२ | २६ | ३६६ |
| | | गडचिरोली | ११७ | ० | ११७ |
| | **एकूण** | | **५३३** | **४१** | **४९२** |
| | **एकूणात एकूण** | | **३८६६** | **४८४** | **३३८२** |